महाराष्ट्र शासन

क्र.मविप-१४१०/प्र.क्र.२१४/१०/१४-अ,
सामान्य प्रशासन विभाग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ११/१/२०११

संदर्भ - १) सा.प्र.वि.आदेश क्र.मविप-१४१०/प्र.क्र.२१४/१०/१४-अ, दिनांक २९ नोव्हेंबर, २०१०.
२) सा.प्र.वि.आदेश क्र.मविप-१४१०/प्र.क्र.२१४/१०/१४-अ, दिनांक १ डिसेंबर, २०१०.

## आदेश

मंत्रालयीन विभागातील व महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कार्यालयातील लिपिक, लिपिक-टंकलेखक व टंकलेखक या संवर्गातील कर्मचा-यांना सहायकांच्या पदावर पदोन्नती देण्यासाठी महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत दिनांक १७ जानेवारी २०१० रोजी मर्यादित विभागीय परीक्षा-२००९ घेण्यात आली होती. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या एकूण १०० उमेदवारांपैकी ९६ उमेदवारांचे सहायक पदावरील नियुक्तीकरीता नियत वाटप समक्रमांकाच्या दिनांक २९.११.२०१० व दिनांक १.१२.२०१० च्या आदेशान्वये करण्यात आले आहे.

२. ज्या मागासवर्गीय उमेदवारांची जाती वैधता प्राप्त झाली नव्हती त्या उमेदवारांचे नियतवाटप करण्यात आले नव्हते. आयोगाने शिफारस केलेल्या श्रीमती ममदापूरकर अर्चना सुहास यांची जाती वैधता प्रमाणपत्र प्राप्त झाले आहे यास्तव त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या विभागात त्यांचे नियतवाटप करण्यात येत आहे.

| अक्र | श्री/ श्रीमती | नांव | गु.क्र | वर्ष | प्रवर्ग | सध्याचा विभाग | पदस्थापनेचा विभाग |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | श्रीमती | ममदापूरकर अर्चना सुहास (कुमारी निकम अर्चना व्यंकटेश) | ८७ | २००९ | अजा | सार्वजनिक आरोग्य विभाग | सार्वजनिक आरोग्य विभाग |

३ श्रीमती ममदापूरकर यांनी सदर नियुक्तीचा स्वीकार या आदेशाच्या तारखेपासून सात दिवसात करावा. श्रीमती ममदापूरकर यांचे नेमणूकीचे आदेश तात्काळ निर्गमित करुन आदेशाची प्रत या विभागास उपलब्ध करुन द्यावी.

४. श्रीमती ममदापूरकर यांनी विहित मुदतीत नियुक्तीचा स्विकार केला तर त्यांची ज्येष्ठता संदर्भाधीन आदेशाच्या तारखेपासून धरण्यात येईल व त्यांची आपापसातील ज्येष्ठता त्यांच्या गुणवत्ता क्रमांकानुसार धरण्यात येईल. विहित मुदतीनंतर नियुक्ती स्वीकारली तर त्यांची ज्येष्ठता अबाधित राहणार नाही.

५. श्रीमती ममदापूरकर यांची सेवा प्रवेश नियमानुसार व सा.प्र.वि.क्र.मविप-१४०९/प्र.क्र.७१/०९/१४-अ, दिनांक २६.१०.२००९ च्या परिपत्रकानुसार सर्व अटींची पूर्तता करीत असल्याचे विभागाने प्रमाणित केले आहे यास्तव त्यांचे नियुक्तीचे आदेश निर्गमित करताना विभागाने त्याबाबतची खात्री करावी. यासाठी श्रीमती ममदापूरकर यांचे आवेदनपत्र सोबत जोडले आहे.

६. श्रीमती ममदापूरकर यांची सहायक पदावरील पदस्थापना त्यांचेविरुध्द कोणत्याही प्रकारची विभागीय चौकशी प्रलंबित नाही, या धारणेच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

७. हे आदेश तात्काळ अंमलात येतील. संबंधित उमेदवारांनी त्यांच्या पदस्थापनेत बदल करण्यासंबंधीच्या विनंतीची दखल घेण्यात येणार नाही.

८. हे आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक २०११०१११११९३२१६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( सु.मो.महाडिक )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
श्रीमती अर्चना सुहास ममदापूरकर, लिपिक-टंकलेखक, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय

प्रत,
प्रधान सचिव, (आस्थापना), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.
सह/उप सचिव (आस्थापना), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२
निवड नस्ती/ संग्रहार्थ